उत्कृष्ट मराठी वाङ्मय निर्मितीस राज्य पुरस्कार देण्याबाबतची योजना.

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुरस-२०१९/प्र.क्र.७१/भाषा-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक: ७ डिसेंबर, २०१९**

**वाचा :-** १) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.रावापु-१०१२/प्र.क्र.१०४/२०१२/भाषा-३, दिनांक १० सप्टेंबर, २०१२.
२)सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.सी.बी.सी.१२/२०१७/प्र.क्र.३४/मावक, दि१८.९.२०१९.
३) महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ पत्र क्र. सासंमं-२०१९/४०२२, दि.४.११.२०१९

**पूरकपत्र :-**

महाराष्ट्र शासनाकडून मराठी भाषेतील उत्कृष्ट वाङ्मय निर्मितीचा राज्य पुरस्कार देण्याची योजना संदर्भाधीन दि.१०.९.२०१२ च्या शासन निर्णयानुसार कार्यान्वित आहे. सदर शासन निणर्यातील जोडपत्र १ नुसार "प्रौढ वाङ्मय" या विभागात अनुक्रमांक १५ येथे नमूद करण्यात आलेल्या "दलित साहित्य" या लेखन प्रकारासाठी रू.१.०० लक्ष इतक्या रकमेचा "लोकशाहीर अण्णाभाऊ साठे पुरस्कार" प्रदान केला जातो. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या सूचनांनुसार सदर पुरस्कारातील "दलित" या संबोधनाच्या अनुषंगाने आवश्यक तो बदल करण्याची कार्यवाही विचाराधीन होती.

२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयामध्ये सर्व सरकारी व्यवहार, प्रकरणे, प्रमाणपत्र इत्यादींमध्ये "दलित" शब्दाऐवजी पर्यायी शब्द वापरण्याबाबत परिच्छेद क्र.३ मध्ये "भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३४१ नुसार निर्गमित केलेल्या मा.राष्ट्रपतींच्या आदेशांतर्गत नमूद अनुसूचित जातीाच्या संबोधनाकरीता सर्व सरकारी व्यवहार, प्रकरणे, प्रमाणपत्र इत्यादींमध्ये "दलित" शब्दाऐवजी इंग्रजी भाषेत "Scheduled Caste & Nav Bouddha" आणि मराठी भाषेत "अनुसूचित जाती व नव बौद्ध" या संबोधनाचा वापर करण्यात यावा. असे सूचित करण्यात आले आहे. ही बाब विचारात घेता अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांच्याकडून संदर्भाधीन दि.४.११.२०१९ च्या प्राप्त शिफारशीनुसार पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

"संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील जोडपत्र - १ मधील "प्रौढ वाङ्मय" या विभागात अनु क्र.१५ येथे नमूद पुरस्काराच्या नावात खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे :

| पुरस्काराचे मूळ नाव | पुरस्काराचे सुधारीत नाव |
|---|---|
| दलित साहित्य<br>लोकशाहिर अण्णाभाऊ साठे पुरस्कार | उपेक्षितांचे साहित्य (वंचित, शोषित, पिडीत, आदिवासी, कष्टकरी, अनुसूचित जाती व नव बौद्ध इत्यादी)<br>लोकशाहिर अण्णाभाऊ साठे पुरस्कार |

संदर्भाधिन दिनांक १०.९.२०१२ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती कायम राहतील.

३. सदर पूरकपत्र (शासन निर्णय) महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०६१५४९१९८६३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: CN = Aparna Arvind Gawde, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Marathi Language
Date: 2019.12.07 10:22:05 +05'30'

**( अपर्णा अ. गावडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
४. मा.सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान सभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर,
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),मुंबई, नागपूर,
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१३. सर्व मंत्रालयीन विभाग,
१४. सर्व विभागीय आयुक्त,
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१७. भाषा संचालक, भाषा संचालनालय, बांद्रा, मुंबई,
१८. अध्यक्ष / सचिव महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
१९. अध्यक्ष / सचिव, महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
२०. संचालक / प्रशासकीय अधिकारी, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
२१. मराठी भाषा विभाग / सर्व कार्यासने,
२२. निवड नस्ती (भाषा-३).